**विलंबाने सेवा उपदान व निवृत्तीवेतन प्रदान केल्यामुळे व्याज अदा करण्याबाबत....**
**श्री. सुरेश गुंडुराव वंडकर, पोलीस निरिक्षक, सेवानिवृत्त.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आयएनटी १०१२/प्र.क्र. २३५/आस्था-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, नवीन प्रशासकीय भवन, १२ वा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ६ जुलै, २०१५.

**वाचा :**

अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल, नायगाव, मुंबई यांचे पत्र क्र. अपोआ/सपो/निवेशा /१४२१/१२, दि. ५.३.२०१२

**प्रस्तावना :**

श्री. सुरेश गुंडुराव वंडकर, पोलीस निरीक्षक हे नाशिक परिक्षेत्र येथे कार्यरत असताना दिनांक २५.११.१९९४ पासून निलंबित होते. निलंबनाधिन असताना दिनांक २८.२.१९९९ रोजी नियत वयोमानानुसार ते सशस्त्र पोलीस दल, नायगाव येथून सेवानिवृत्त झाले. सदर निलंबन कालावधी हा जशास तसा गणण्यात आला होता. प्रस्तुत प्रकरणी श्री. वंडकर यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्रमांक ९५/२००९ मध्ये दिलेल्या निर्णयानुसार श्री. वंडकर यांचा दि. २५.११.१९९४ ते २८.२.१९९९ हा निलंबन कालावधी कर्तव्य कालावधी म्हणून गणण्यात आला असून या निर्णयामुळे उपदान रक्कम व सेवानिवृत्तीवेतन यासंदर्भातील फरकाची रक्कम विलंबाने प्रदान झाल्याने, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मूळ अर्ज क्रमांक ९५/२००९ व मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ यांनी रिट याचिका क्रमांक २६८८/२०१० मध्ये दिलेल्या निर्णयानुसार, त्यावर ९% दराने व्याज अदा करावयाचे आहे.

मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांच्या निर्णयानुसार श्री. वंडकर यांचा निलंबन कालावधी हा कर्तव्य कालावधी म्हणून गणण्यात आल्याने त्यांच्या वेतनामध्ये सुधारणा होऊन सुधारित दराने सेवानिवृत्तीवेतन प्रकरण दिनांक १५.१.२०११ रोजी महालेखापाल, मुंबई यांना सादर करण्यात आले होते. सदर प्रकरण दिनांक ७.२.२०११ रोजी मंजूर होऊन अपर पोलीस आयुक्त,सशस्त्र पोलीस दल, नायगाव यांना प्राप्त झाले. श्री. वंडकर यांना ४ थ्या वेतन आयोगानुसार उपदानाची फरकाची रक्कम रु १६,६०६/- दिनांक १७.३.२०११ रोजी प्रदान करण्यात आली. सदरहू रकमेवर, मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार, दिनांक १५.६.२००६ ते दिनांक १६.३.२०११ या कालावधीकरिता रु. ७,१०६/- इतके व्याज देय ठरते. तसेच, ५ व्या वेतन आयोगानुसार वेतन पडताळणी होऊन श्री. वंडकर यांना सेवा-नि-उपदान फरकाची रक्कम रु. ५६,५५०/- दिनांक १०.६.२०११ रोजी उशिराने प्रदान केल्यामुळे त्यावर दिनांक १५.६.२००६ ते ९.६.२०११ या कालावधीकरिता रु. २५,३८०/- इतके व्याज देय झालेले आहे. सबब, ४ थ्या वेतन आयोगानुसार व ५ व्या वेतन आयोगानुसार उपदान फरकाच्या रकमेवर असे एकूण रु. ३२,४८६/- इतके व्याज देय आहे.

मा. उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार श्री. वंडकर यांना सेवानिवृत्तीवेतन फरक रक्कम रु. २३,५०५/- इतकी आहे. सदर रकमेवर दिनांक १५.६.२००६ ते दि. ३१.७.२०११ या कालावधीकरिता रु. १०,६७४/- इतके व्याज देय आहे.

## शासन निर्णय :

श्री. वंडकर यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्रमांक ९५/२००९ मध्ये दिलेल्या निर्णयानुसार श्री. वंडकर यांचा दि. २५.११.१९९४ ते २८.२.१९९९ हा निलंबन कालावधी कर्तव्य कालावधी म्हणून गणण्यात आला असून या निर्णयामुळे उपदान रक्कम व सेवानिवृत्तीवेतन यासंदर्भातील फरकाची रक्कम विलंबाने प्रदान झाल्याने, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मूळ अर्ज क्रमांक ९५/२००९ व मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्रमांक २६८८/२०१० मध्ये दिलेल्या निर्णयानुसार, त्यावर ९% दराने व्याज रु. ४३,१६०/- (अक्षरी रु. त्रेचाळीस हजार एकशे साठ मात्र) अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदरहू खर्च लेखाशिर्ष २०७१ निवृत्तीवेतन व इतर, निवृत्तीवेतन लाभ, ०१ नागरी या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३१/२०१२/सेवा-७, दिनांक ३.११.२०१२ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०६१२४६४५२७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yuvraj Bayaji Ajetrao

Digitally signed by Yuvraj Bayaji Ajetrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yuvraj Bayaji Ajetrao
Date: 2015.07.06 12:49:49 +05'30'

**युवराज अजेटराव**
**अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई.
३) अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल, नायगाव, मुंबई.
४) महालेखापाल ( लेखा व हकदारी), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७) निवड नस्ती (आस्था-१).